**नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्हयातील सुरजागड येथील १) नेंडेर व २) येलचील या ०२ सक्षस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी प्रत्येकी ०५ पोलीस उप निरीक्षक व ४५ पोलीस शिपाई याप्रमाणे एकूण १०० पदे निर्माण करण्यास व त्यानुषंगिक येणाऱ्या आवर्ती आणि अनावर्ती खर्चास मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-२८१७/प्र.क्र.१/पोल-३**
मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : १४ सप्टेंबर, २०१८.

वाचा :-

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-अ/४७/गडचिरोली (पो.मदतकेंद्र)/१७४/२०१६, दि.०६.०६.२०१६, दि.२९.१२.२०१६ व दि.२४.०४.२०१७.
२) मा.उच्चस्तर सचिव समितीच्या दिनांक ०९.०८.२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त.

प्रस्तावना :-

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन दिनांक २४.०४.२०१७ रोजीचे पत्रान्वये नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्हयातील सुरजागड येथील लोखंडाच्या खाणीच्या संरक्षणासाठी १) नेंडेर २) पिपलीबुर्गी ३) मुरेवाडा ४) तुमरकोटी ५) येलचील या प्रस्तावित सशस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी प्रत्येकी ०५ पोलीस उपनिरीक्षक व १०० पोलीस शिपाई याप्रमाणे २५ पोलीस उपनिरीक्षक व ५०० पोलीस शिपाई यांची पदे निर्माण करण्याचा व तद्नुषंगीक येणारा आवर्ती व अनावर्ती खर्च मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सदर प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता प्रस्तावित ०५ सशस्त्र पोलीस मदत केंद्रापैकी १) नेंडेर व २) येलचील येथे सशस्त्र पोलीस मदत केंद्र निर्माण करण्याचा तसेच सदर ०२ सशस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी प्रत्येकी ०५ पोलीस उप निरीक्षक व ४५ पोलीस शिपाई याप्रमाणे १०० पोलीस अधिकारी/कर्मचारी यांची पदे निर्माण करण्यास आणि त्यासाठी येणा-या आवर्ती खर्च रू.३,७५,०६,९६०/- व अनावर्ती खर्च रू.३,४०,०००/- अशा एकूण रू.३,७८,४६,९६०/-(रूपये तीन कोटी अठ्ठयाहत्तर लाख सेहचाळीस हजार नउशे साठ फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव उच्चस्तरीय समितीपुढे सादर करण्याबाबत अभिप्राय दिले. याअनुषंगाने मा.उच्चस्तर सचिव समितीने दिनांक

०९.०८.२०१८ रोजी झालेल्या ५ व्या बैठकीमध्ये १)नेंडेर व २) येलचील या ०२ सक्षस्त्र पोलीस मदत केंद्रासाठी प्रत्येकी ०५ पोलीस उप निरीक्षक व ४५ पोलीस शिपाई याप्रमाणे एकूण १०० पदे निर्माण करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**:-

नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्हयातील सुरजागड येथील लोखंडाच्या खाणीच्या संरक्षणासाठी १)नेंडेर व २) येलचील ०२ सक्षस्त्र पोलीस मदत केंद्राची निर्मिती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त नवनिर्मित १)नेंडेर व २) येलचील या ०२ सक्षस्त्र पोलीस मदत केंद्राकरिता खालील तक्त्यात नमूद संवर्गातील १०० पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| **१) नेंडेर सक्षस्त्र पोलीस मदत केंद्र** | | | |
| १. | पोलीस उपनिरीक्षक | रु. ९३००-३४८००+ ग्रेड पे ४३०० | ०५ |
| २. | पोलीस शिपाई | रु.५२००-२०२००+ ग्रेड पे २००० | ४५ |
| **एकुण पदे -** | | | ५० |
| **२) येलचील सक्षस्त्र पोलीस मदत केंद्र** | | | |
| १. | पोलीस उपनिरीक्षक | रु. ९३००-३४८००+ ग्रेड पे ४३०० | ०५ |
| २. | पोलीस शिपाई | रु.५२००-२०२००+ ग्रेड पे २००० | ४५ |
| **एकुण पदे -** | | | ५० |

३. उपरोक्त तक्त्यात नमूद करण्यात आलेली पोलीस अधिकारी/कर्मचारी यांची पदे त्यासाठी केलेल्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार भरण्यात यावीत.

४. सदर नवनिर्मित ०२ सक्षस्त्र पोलीस मदत केंद्र निर्माण करण्यासाठी येणारा आवर्ती खर्च रू.३,७५,०६,९६०/- व अनावर्ती खर्च रू.३,४०,०००/-मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४४१/आपुक, दिनांक ०४.०८.२०१८ अन्वये वित्त विभागाने तसेच मा.उच्चस्तर सचिव समितीने दि.०९.०८.२०१८ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१४१६४४३४९७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh Appaji Saste

Digitally signed by Dinesh Appaji Saste
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a49495d0d4b31e36ff1d612a85453ca984b74e28fd6f99cdf66e3e499969e942, cn=Dinesh Appaji Saste
Date: 2018.09.14 16:46:35 +05'30'

**( दिनेश आ. सस्ते )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री,गृह (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. विशेष पोलीस महानिरीक्षक, नागपूर परिक्षेत्र, नागपूर.
१०. जिल्हाधिकारी, नागपूर.
११. पोलीस अधीक्षक, गडचिरोली.
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
१४.उप सचिव(पोल ५ अ/ब),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१६. वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.
१७. निवड नस्ती, पोल-३.